इंडियन रेड क्रॉस सोसायटी, महाराष्ट्र राज्य शाखा, मुंबई या संस्थेला सन २०१८-१९ या वर्षासाठी शासकीय अनुदान देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अनुदान-२०१८/प्र.क्र.५२/राकावि-२**
१० वा मजला, गोकूळदास तेजपाल रुग्णालय आवार,
नवीन इमारत मंत्रालय, मुंबई.
दिनांक : ७ डिसेंबर, २०१९.

वाचा -

**१) सहाय्यक संचालक, (लेखा व लेखा परीक्षा) पुणे यांचे पत्र क्र.ससंआसे/कक्ष-६४/सहा.अनु/इंरेक्रॉसोस/व्याज/३३७५-७६/२०१९, दिनांक १५.०३.२०१९**

प्रस्तावना -

तत्कालीन शासन व इंडियन रेड क्रॉस सोसायटी, मुंबई यांच्या दरम्यान सन १९३८ मधील करारानुसार संबंधित संस्थेस जागेचे भाडे शासनाकडून देय आहे. तद्नुसार, इंडियन रेड क्रॉस सोसायटी, महाराष्ट्र राज्य शाखा, मुंबई या सस्थेला जागेच्या भाडयासाठी दरवर्षी रुपये १०,११६.५० याप्रमाणे अनुदान मंजूर करण्यात येते. त्यानुषंगाने, सन २०१८-१९ साठी रुपये १०,११६.५० इतके अनुदान उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

या शासन निर्णयान्वये इंडियन रेड क्रॉस सोसायटी, महाराष्ट्र राज्य शाखा, मुंबई या संस्थेला जागेच्या भाडयासाठी, सन २०१८-१९ साठी रुपये १०,११६.५०/- (अक्षरी रुपये दहा हजार एकशे सोळा रुपये पन्नास पैसे फक्त) इतके सहायक अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

ज्या ज्यावेळी निरिक्षणासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना संस्थेने हिशोब पाहिजे असतील त्या त्यावेळी ते प्रस्तुत कागदपत्रांसहित संस्थेने सादर करावेत.

शासकीय अनुदान म्हणून मिळणाऱ्या रकमेचे हिशोब संस्थेने त्यांच्या नेहमीच्या इतर कार्यक्रमाहून वेगळे ठेवणे आवश्यक आहे.

मंजूर नसलेल्या बाबीवरील खर्चाचा समावेश अनुदानात करण्यात आल्याचे आढळून आल्यास त्या खर्चाची एक रक्कमी वसुली करण्याचा अधिकार शासनास राहिल. त्याकरीता वेळेचे बंधन असणार नाही.

या बाबीवरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि चालू आर्थिक वर्षात (सन २०१९-२०) आर्थिक तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,

०३ - मुफसल रुग्णालय व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान,

(०३) (०१)- अध्यापनेतर रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान

३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१० ०१७३)

सदरचे देयक कोषागारातूर आहरित करुन इंडियन रेड क्रॉस सोसायटी, महाराष्ट्र राज्य शाखा, मुंबई या संस्थेस वितरीत करण्यासाठी उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग एक, अ.क्र.२७, नियम क्र.१४९ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०७१५४७४५९६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra R Gadhari

Digitally signed by Ravindra R Gadhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9668226de60c3cc5b8ccd56833c07d32831e4140f3de291d1f40d510d295643f, serialNumber=8f564edcac5a4c4a79542e69f18152eb1ab86474731f4ac3d8424b8b56a653e1, cn=Ravindra R Gadhari
Date: 2019.12.07 16:16:06 +05'30'

**र.र.गढरी**

उप सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

२. सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थसंकल्प व प्रशासन), पुणे.

३. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.

४. नियंत्रक, लेखा परिक्षा व लेखा सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य), पुणे.

५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

६. निवासी लेखाधिकारी, मुंबई.

७. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, ठाणे.
८. महालेखापाल, १/२ (लेखापरिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर, महाराष्ट्र.
९. वित्त विभाग, (व्यय-१३) मंत्रालय, मुबई.
१०. मानद सचिव, इंडियन रेड क्रॉस सोसायटी, महाराष्ट्र राज्य शाखा, इंडियन रेड क्रॉस चौक, १४१, शहीद भगतसिंग रोड, टाऊन हॉल कंम्पाऊंड, मुंबई-४०० ००१.
११. अवर सचिव (अर्थसंकल्प कार्यासन), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती राकावि-२.